सन २०१४-१५ करीता तेजस्विनी अंतर्गत प्रकल्प व्यवस्थापनाकरिता व्यवस्थापकीय अनुदान उपलब्ध करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१४/प्र.क्र.१०७/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख-२० जानेवारी, २०१५.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.माविम-२०१४/प्र.क्र.९७/का-१०, दि.१७ मे, २०१४.
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.माविम-२०१४/प्र.क्र.९७/का-१०, दि.३१ जुलै, २०१४.

**प्रस्तावना :-**

सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी २२३५-१३१६, ३६- सहायक अनुदान (वेतन) या लेखाशिर्षाखाली मूळ अर्थसंकल्पिय तरतूद रु.७००.०० लक्ष + पुरवणी मागणीव्दारे मंजूर तरतूद रु.५११.४३ लक्ष अशा एकूण रु.१२११.४३ लक्ष तरतूद उपलब्ध आहे. सदर तरतूदीपैकी महिला आर्थिक विकास महामंडळास संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये रु.४.२० कोटी इतकी तरतूद वितरित करण्यात आली असून त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास प्राप्त झाले आहे. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी २२३५-१३१६, ३६- सहायक अनुदान (वेतन) या लेखाशिर्षाखाली उर्वरित अवितरीत तरतूद वितरित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावावर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

दिनांक २० जानेवारी, २००३ अन्वये महिला आर्थिक विकास महामंडळाची (माविमची) पुर्नरचना करण्यात आलेली आहे. त्यामध्ये सन २००२-०३ पासून माविमला प्रशासकीय खर्चाकरीता दरवर्षी आवश्यकतेप्रमाणे व्यवस्थापकीय अनुदान देण्यात येईल, असा निर्णय शासनाने घेतला आहे. माविमकडून स्थापित महिला बचतगटांची संख्या वाढत असल्याने, राज्य शासनाने शासन निर्णय क्रमांक- माविम-२००२/ प्र.क्र.१०६/ का-१०, दिनांक ५.२.२००७ नुसार आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी सहाय्यित तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रम माविममार्फत राबविण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. सदर कार्यक्रम राबविण्याबाबत केंद्र शासन, महाराष्ट्र शासन व आंतरराष्ट्रीय कृषि विकास निधी यांच्यामध्ये दिनांक १२.१०.२००६ रोजी करार झाला असून, तो सन २००६-०७ ते २०१४-१५ या आठ वर्षाच्या कालावधीत राबविण्यात येणार आहे. हा कार्यक्रम राबविण्याकरीता माविमच्या एकूण पदांमध्ये वाढ करुन माविमकरीता ११० नियमित पदे व १६० करार तत्वावरील पदे अशा एकूण २७० पदांना मंजूरी दिली आहे.

३. सन २०१४-१५ या वित्तीय वर्षाचा (प्रकल्प व्यवस्थापन) प्रशासकीय खर्च, वेतन, भत्ते, कार्यालयीन खर्च, इत्यादी भागविण्यासाठी माविमला २२३५- १३१६ ३६ सहायक अनुदान (वेतने) या लेखाशिर्षाखालील अवितरित तरतुदीपैकी **₹७,९१,४३,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी एक्यान्नव लक्ष त्रेचाळीस हजार फक्त)** इतके व्यवस्थापकीय अनुदान तेजस्विनी योजनेंतर्गत वितरित करण्यास शासन मंजूरी देत आहे.

४. तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रमाखाली उपलब्ध करुन द्यावयाच्या निधीमध्ये सदरचा निधी अंतर्भूत असल्याने सदर ₹७,९१,४३,०००/- (अक्षरी रुपये सात कोटी एक्यान्नव लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) हा निधी तेजस्विनी महाराष्ट्र ग्रामीण महिला सक्षमीकरण कार्यक्रमामधील राज्य शासनाचा हिस्सा म्हणून ग्राहय धरण्यात यावा.

५. याकरीता जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी हा निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरित करावा.

६. मुक्त करण्यात आलेले अनुदान जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व उपसचिव, महिला व बाल विकास यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील मंजूर रक्कम धनादेशाद्वारे अदा करावी. उपसचिव, महिला व बाल विकास यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

७. हा खर्च मागणी क्रमांक एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०३, महिला कल्याण, (०३) इतर योजना (०३) (०१) महिला आर्थिक विकास महामंडळ (२२३५ १३१६) (महिला सक्षमीकरण) ३६ सहायक अनुदान (वेतने) या लेखाशिर्षाखालील सन २०१४-१५ या वर्षासाठी उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

८. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२८/१५, व्यय-६, दि.१७.१.२०१५ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०११९१४५३५७५४३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vibhute Chandrakant A

Digitally signed by Vibhute Chandrakant A
DN: CN = Vibhute Chandrakant A, C = IN, S = Maharashtra, O = Government of India, OU = Women and child Department
Date: 2015.01.20 15:30:59 +05'30'

**चंद्रकांत विभूते**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग
११. निवड नस्ती, का-१०.